नवीन महाराष्ट्र सदन,नवी दिल्ली
येथील कक्षबंधांचे आरक्षण व दर
यामध्ये सुधारणा करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. सदन २४१५/२४८/प्र.क्र.४२/२०-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- १ सप्टेंबर, २०१५

वाचा - शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. निआ/व्यमस/म.स./क.गां.मार्ग/ क.बं.दर/ २०१४ / ५९३, दि.१७ जून, २०१४

**प्रस्तावना:-**

संघीय गणतांत्रिक व्यवस्थेत केंद्र आणि राज्य शासन व इतर राज्य शासन यांच्याशी सुसंवाद ठेवणे, आंतरराष्ट्रीय संबंध जोपासणे, राज्यात गुंतवणुकीस प्रोत्साहन देणे तसेच राजशिष्टाचाराची कामे पार पाडणे या सर्व व्यवस्थेकरिता भारताची राजधानी नवी दिल्ली येथे राज्य शासनाच्या पायाभूत संरचनेत निवासी आयुक्तालय हे अग्रणी कार्यालय आहे. सदर मौलिक उद्देश पूर्ण करण्याच्या दिशेने सन १९६३ सालापासून नवी दिल्ली येथील सांगली प्लॉटवर आधी “महाराष्ट्र हाऊस” व नंतर “महाराष्ट्र सदन” या नावाने ओळखल्या जाणाऱ्या वास्तुमध्ये ही प्रमुख राजशिष्टाचारीय व्यवस्था कार्यरत आहे. राज्याच्या या उदात्त व्यवस्थेमध्ये योगदान देणाऱ्या अभ्यागतांचा नवी दिल्ली येथील मुक्काम सुखकर व्हावा या उद्देशाने राज्य शासनाने नवी दिल्ली येथील कस्तुरबा गांधी मार्गावर अत्याधुनिक सुखसुविधांनी युक्त असे दुसरे राज्य अतिथीगृह (नवीन महाराष्ट्र सदन) बांधले असून ते दिनांक १५ ऑगस्ट, २०१३ पासून वापरासाठी खुले करण्यात आले आहे.

संदर्भीय दिनांक १७ जून २०१४ च्या शासन निर्णयान्वये नवीन महाराष्ट्र सदनातील कक्षबंधांचे आरक्षण व दर यासंदर्भात धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद पार्श्वभूमीवर दिनांक १७ जून २०१४ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे. नवी दिल्ली येथील कस्तुरबा गांधी मार्गावरील नवीन महाराष्ट्र सदनातील कक्षबंधांचे आरक्षण व दर यासंदर्भातील धोरण पुढीलप्रमाणे राहील-

तक्ता-१

| अ.क्र. | वर्गीकरण | कक्षबंधांची संख्या |
|---|---|---|
| १ | मा. राज्यपाल | १ |
| २ | मा. मुख्यमंत्री | १ |
| ३ | मा. सर्वोच्च/ उच्च न्यायालयाचे न्यायाधीश/ उपमुख्य मंत्री | १ |
| ४ | मा.मंत्री (कॅबिनेट व तत्सम दर्जा प्राप्त) | ७ |
| ५ | मा.राज्यमंत्री व तत्सम दर्जा प्राप्त | १६ |
| ६ | मा. विधान परिषद व विधान सभा सदस्य | ५० |
| ७ | मुख्य सचिव, अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव (कार्यरत तथा सेवानिवृत्त) | ६ |

| | | |
|---|---|---|
| ८ | अधिकारी/अतिथी | ५४ |
| ९ | विकलांगांसाठी कक्षबंध | १ |
| १० | वैद्यकीय सहाय्यता कक्ष | १ |
| ११ | अत्यावश्यक सेवांसाठी कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी राखीव व अनारक्षित कक्षबंध | ४ |
| **टीप:** *उपरोक्त अ.क्र.६ येथील प्रवर्गासाठी आरक्षित करण्यात आलेल्या ५० कक्षबंधांपैकी २० कक्ष बंध हे केवळ सदर प्रवर्गासाठीच ठेवावे. मात्र उर्वरित ३० कक्षबंधांपैकी कक्षांचे आरक्षण सदर प्रवर्गातून झाले नसल्यास सदर कक्षबंध हे उपरोक्त क्र.८ येथील प्रवर्गातील व्यक्तींना देण्यांत यावेत.* | | |

२. नवीन महाराष्ट्र सदनामध्ये मान्यवर/शासकीय अधिकारी तसेच इतर अभ्यागतांना खालील तक्त्यातील (तक्ता-२) रकाना ३ व ४ प्रमाणे दर आकारणी लागू राहील.

तक्ता-२

| संवर्ग | वर्गीकरण | शासकीय कामावर असल्यास (शुल्क प्रति कक्षबंध प्रतिदिन) रुपये | शासकीय कामावर नसल्यास (शुल्क प्रति कक्षबंध प्रतिदिन) रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| अ) | (१) मा. राज्यपाल | नि:शुल्क | नि:शुल्क |
| | (२) माजी राष्ट्रपती | - | नि:शुल्क |
| | (३ ) मा. मुख्य मंत्री | नि:शुल्क | नि:शुल्क |
| | (४) मा. उपमुख्य मंत्री | नि:शुल्क | नि:शुल्क |
| | (५) मा. सर्वोच्च न्यायालयाचे न्यायाधीश/ मा.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र व समकक्ष | ५०० | १००० |
| | (६) विधान परिषदेचे मा. सभापती/ विधान सभेचे मा.अध्यक्ष/ उच्च न्यायालयाचे मा. मुख्य न्यायमूर्ती व समकक्ष | ५०० | १००० |
| | (७) मा. लोक आयुक्त | ५०० | १००० |
| | (८) मा. मंत्री/मा. विरोधी पक्ष नेता व समकक्ष | ५०० | १००० |
| | (९) उच्च न्यायालयाचे मा. न्यायमूर्ती/ मा. उप लोकायुक्त व समकक्ष | ५०० | १००० |
| | (१०) विधान परिषदेचे मा. उप सभापती/ विधान सभेचे मा. उपाध्यक्ष | ५०० | १००० |
| | (११)मा. राज्यमंत्री व समकक्ष | ५०० | १००० |
| | (१२)मा. विधानमंडळाच्या समित्यांचे सभासद | ५०० | १००० |
| | (१३) मा. विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य | ५०० | १००० |
| | (१४) राज्य शासनाने शासकीय अतिथी म्हणून घोषित केलेल्या अतिविशिष्ट व्यक्ती | नि:शुल्क (तीन दिवसांपर्यंत) | ६००० (तीन दिवसानंतर) |

| | | | |
|---|---|---|---|
| ब) | (१) राज्यातील संसद सदस्य (दिल्ली येथे शासकीय निवासस्थान उपलब्ध नसल्यास व तसे संबंधित प्राधिकाऱ्याने प्रमाणित केल्यावर)<br>(२)मंत्रालयातील सर्व अधिकारी<br>(३)महाराष्ट्रातील दिवाणी, फौजदारी, जिल्हा, औद्योगिक न्यायालयांचे मा. न्यायाधीश व प्रशासकीय न्यायाधिकरणांचे मा. सदस्य | ५०० | १००० |
| क) | (१) राज्यातील जिल्हा परिषद अध्यक्ष व महानगरपालिकांचे महापौर<br>(२) राज्य शासनाच्या समित्यांचे अशासकीय सभासद (कार्यालयामार्फत आरक्षण केल्यास)<br>(३) महाराष्ट्रातील सर्व माजी खासदार/ आमदार<br>(४) राज्य शासनाचे अधिकाऱ्यांवर अवलंबित कुटुंबिय सदस्य (अधिकाऱ्यांबरोबर नसल्यास)<br>(५) महाराष्ट्र तुकडीतील अखिल भारतीय सेवा/ राज्य शासनाचे सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी<br>(६) अधिस्विकृत पत्रकार<br>(७) दलितमित्र/समाजभूषण पुरस्कार प्राप्त व्यक्ती<br>(८) स्वातंत्र्य सैनिक<br>(९) महानगर पालिका, नगर पालिका/ मंडळे/ महामंडळे, विविध प्राधिकरणाचे अधिकारी/ कर्मचारी/स्वायत्त विद्यापीठाचे अधिकारी/ कर्मचारी व सिनेट सदस्य | ५०० | १००० |
| ड) | (१)इतर राज्याचे मंत्री/ मा. खासदार/ आमदार | २००० | २००० |
| | (२)केंद्र व इतर राज्य शासनाचे अधिकारी | २००० | ६००० |
| | (३)केंद्र शासनाच्या/इतर राज्य शासनाच्या/ केंद्र शासकीय उपक्रमाचे सेवानिवृत्त अधिकारी | - | २००० |
| इ) | खाजगी अभ्यागत | - | ६००० |
| फ) | (१)संघ लोकसेवा आयोगाच्या मुख्य परिक्षेत उत्तीर्ण झालेल्या व मुलाखतीसाठी महाराष्ट्रातून नवी दिल्ली येथे येणा-या परिक्षार्थींना महाराष्ट्र सदन येथे mock interview, मुलाखतीसाठी व त्यानंतर होणा-या वैद्यकीय तपासणीसाठी जास्तीत जास्त ७ दिवसांपर्यंत | ५०० | - |
| | (२) वरील परिक्षार्थींसोबत येणारे पालक/ कुटुंबिय/ नातेवाईक | -- | रु.१०००/-प्रति पलंग प्रति दिवस |

*<u>टीप</u> : वरील शुल्क केवळ निवास व्यवस्थेवरील असून यामध्ये खानपान सेवा, लॉन्ड्री, इंटरनेट, जिम, ब्रेकेज व अन्य शुल्कांचा अंतर्भाव नाही.*

२.१ अटी व शर्ती

i) नवीन महाराष्ट्र सदन अतिथीगृहातील व्यवस्था ही प्रस्तावनेत नमूद केलेल्या मौलिक उद्देशास मूर्तरुप देण्यासाठी वापरली जाईल. सदरची व्यवस्था सर्वसामान्य नागरिकांना गरजेनुरुप व उपलब्धतेनुसार तसेच अभ्यागतांची प्रतिष्ठा विचारात घेऊन वाटप केले जाईल.

ii) अतिथीगृहात वास्तव्य करणाऱ्या सर्व मान्यवर अभ्यागतांनी लोकसेवकांकडून अपेक्षित अशीच वर्तणूक व शिस्तीचे पालन करणे बंधनकारक राहील.

iii) वर्गवारी “इ” मधील खाजगी अभ्यागतांचे कक्षबंधाचे आरक्षण/वाटप हे “अ” वर्गवारीतील अतिविशिष्ट प्राधिकारी/राज्य अतिथी, “ब” वर्गवारीतील विद्यमान लोकप्रतिनिधी, मंत्रालयातील किंवा केंद्रीय सचिवालयातील वरिष्ठ शासकीय अधिकारी यांच्या संदर्भावरुन केले जाईल.

iv) कक्षबंधाचे वाटप करतांना विशेष अपवादात्मक परिस्थिती वगळता, पलंगास घटक न धरता पूर्ण कक्षबंधाचे भाडे आकारण्यात येईल.

v) कक्षबंध वाटपापासून २४ तासपर्यंत एक दिवस गणण्यात येईल. तसेच २४ तासांपेक्षा कमी वेळेसाठी एक दिवस गणला जाईल.

vi) अतिथीगृहात आगमनाच्या वेळी वर्गवारी “ब”, “क”, “ड” “इ” व “फ” मधील संबंधित मान्यवर अतिथी यांनी विहित प्रपत्रात सर्व आवश्यक माहितीची नोंद करुन स्वागत कक्षात हस्तांतरीत करावी, ज्यानंतर त्यांना कक्षबंधाचे वाटप केले जाईल.

vii) कक्षबंधामध्ये आरक्षण अहस्तांतरणीय राहिल. ज्यांच्या नावाने कक्षबंधाची नोंदणी झाली असेल त्यांच्या व्यतिरिक्त अन्य व्यक्ति कक्षबंधामध्ये रहात असल्याचे आढळून आल्यास कक्षबंध रिकामा करवून घेतला जाईल.

viii) कक्षबंधामध्ये सोबत राहणाऱ्या सर्व व्यक्तिंचे फोटोसह ओळखपत्र आरक्षणाच्या नोंदणीच्या वेळी उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील. तसेच त्यांची नोंदही नोंदणी रजिस्टरमध्ये करणे बंधनकारक राहील.

ix) नवी दिल्ली येथे मुख्यालय असलेल्या मान्यवरांना आरक्षण देता येणार नाही.

x) कक्षबंधामध्ये कोणतेही अतिरिक्त बेडिंग पुरविण्यात येणार नाही.

xi) “इ” व “फ” वर्गवारीतील अभ्यागतांचे कक्षबंधाचे शुल्क आगाऊ स्वरुपात रोखीने भरणे बंधनकारक राहील.

xii) “ब” “क” व “ड”वर्गवारीतील पात्र अभ्यागतांना अतिरिक्त/जादा कक्षबंध त्यांच्या आप्तेष्टांसाठी आवश्यक असल्यास व्यवस्थापनाच्या लेखी पूर्व परवानगीने उपलब्धतेनुसार वाटप करता येईल व त्यासाठी प्रति कक्षबंधाकरिता प्रतिदिन खाजगी अभ्यागतांसाठीचा दर लागू राहील व तो विहित प्रक्रियेने आगाऊ स्वरुपात भरणे बंधनकारक राहील.

xiii) अतिथीगृहातील कोणत्याही वस्तु अभ्यागतांकडून हरविल्यास अथवा तुटल्यास, त्या वस्तूंच्या प्रचलित बाजारभावापेक्षा दुप्पट रक्कम मोबदला म्हणून कक्षबंध सोडण्याच्यावेळी देयकामध्ये आकारण्यात येईल.

xiv) “ब” “क” व “ड” वर्गवारीतील अभ्यागत खाजगी कामावर असताना महाराष्ट्र सदनातील निवास ३ दिवसांहून अधिक काळ झाल्यास ४ थ्या दिवसापासून ७ व्या दिवसापर्यंत कक्षाचे प्रतिदिन

भाडे दुप्पट आकारले जाईल. वास्तव्याचा कालावधी ७ दिवसांपेक्षा जास्त वाढत असल्यास वाढीव भाडे आकारणीच्या रक्कमेमध्ये ७ दिवसांनंतर प्रतिदिवस १० टक्केने वाढ लागू होईल.

xv) अपवादात्मक परिस्थितीत खाजगी कारणास्तव कक्षबंधाचे आरक्षण जास्तीत जास्त १५ दिवसापर्यंत निवासी आयुक्त यांच्या पातळीवर देणे शक्य होईल. १५ दिवसांपेक्षा जास्त दिवस आरक्षण देण्यासाठी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांची मान्यता आवश्यक राहील.

xvi) बदली अथवा प्रतिनियुक्ती प्रसंगी कक्षबंध आरक्षणाकरिता यापूर्वी निर्गमित झालेल्या विशेष आदेशाच्या अटी व शर्ती लागू राहील. राज्य शासनाचे अथवा अखिल भारतीय सेवेच्या महाराष्ट्र तुकडीतील केंद्रीय प्रतिनियुक्तीवरील अधिकारी यांना निवासस्थान मिळेपर्यंतच्या कालावधी करिता मासिक मूळ वेतनाच्या १० टक्के रक्कम आकारण्यात येईल (जास्तीत जास्त तीन महिनेपर्यंत).

xvii) आरक्षणाची मौलिक तत्वे तसेच परिचालनात्मक व्यवस्थेत, या शासन निर्णयाद्वारे स्पष्ट करण्यात आलेल्या विविध पैलुंव्यतिरिक्त, काही शंका निर्माण झाल्यास त्याबाबत निवासी आयुक्त, महाराष्ट्र शासन यांचा निर्णय अंतिम राहील.

xviii) कक्षबंधांचे आरक्षण देताना काही प्रसंगी मा. न्यायाधीशांची संख्या जास्त असल्यास कक्षबंधाच्या उपलब्धतेप्रमाणे मा. मंत्र्यांसाठी राखीव कक्ष अग्रक्रमाने त्यांना आवंटित करण्यात येतील. त्या परिस्थितीत मा. मंत्री महोदयांना मा. राज्यमंत्र्यांचे कक्षबंध व मा. राज्यमंत्र्यांना मा. आमदारांचे कक्ष आवंटित केले जातील.

xix) कक्षबंध रिकामा करताना मान्यवर अभ्यागतांनी सर्व प्रकारचे शुल्क/देयके अदा करुन त्याची पोचपावती घेणे आवश्यक राहील.

३. नवीन महाराष्ट्र सदनामध्ये असलेल्या दृकश्राव्य कक्ष (Video Conferencing Hall), वार्ताहर कक्ष, बॅन्क्वेट/बक्वेट हॉल व बैठक कक्ष इत्यादीसाठी दर आकारणी खालीलप्रमाणे (तक्ता-३) राहील.

<u>तक्ता-३</u>

| अ.क्र. | वर्गीकरण | अर्धा दिवस (रुपये) | पूर्ण दिवस (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | वार्ताहर कक्ष | १५,०००/- | २५,०००/- |
| २ | बॅक्वेट हॉल (२५० आसन क्षमता) | ३०,०००/- | ५०,०००/- |
| ३ | बैठक कक्ष (पहिला मजला) Video Conferencing Hall | २०,०००/- | ३०,०००/- |
| ४ | बैठक कक्ष (१० आसन क्षमता) | ३,०००/- | ५,०००/- |
| ५ | व्यायाम कक्ष (महिला व पुरुष) | रु.५०/- प्रति अर्धा तास अथवा त्यापेक्षा कमी वेळेसाठी | |
| ६ | बॅक्वेट हॉल-II (पहिला मजला) (५० आसन क्षमता) | ३,०००/- | |
| ७ | बॅक्वेट हॉल---II (पहिला मजला) (५० + ५० आसन क्षमतेचे दोन्ही हॉल एकत्रित) | ५,०००/- | |

*टीप :- १. वरील दरांमध्ये खानपान, ब्रेक्रेज व अन्य शुल्कांचा अंतर्भाव नाही.*

*२. महाराष्ट्र शासनाची शासकिय कार्यक्रमानिमित्त किंवा शासनाने विशेष रित्या आदेशित केलेल्या कार्यक्रमासाठी वरील शुल्क आकारले जाणार नाही.*

३.१ <u>अटी व शर्ती</u>

i) उपरोक्त प्रकारच्या सर्व आरक्षणाची सोय फक्त तक्ता-२ मधील "अ", "ब" "क" व "ड" मध्ये नमूद केलेल्या अभ्यागतांना तसेच मंत्रालयीन व केंद्रीय सचिवालयातील विभाग तसेच निरनिराळया प्राधिकाऱ्यांसाठी उपलब्ध राहील.

ii) भाडे विहित प्रक्रियेने आगाऊ स्वरुपात भरावे लागेल.

iii) खाजगी व्यक्तींना तक्ता-३ मधील सुविधांचे आरक्षण देता येणार नाही. याबाबत जनहित व गुणवत्तेवर योग्यायोग्य ठरविण्याचे पूर्ण अधिकार निवासी आयुक्त यांचे राहतील.

iv) हॉलमधील कार्यक्रमांचा अतिथीगृहातील इतरांना कोणताही त्रास होणार नाही याची काळजी संबंधित आयोजकांनी घ्यावयाची आहे. हॉलमधील फर्निचर व ध्वनीक्षेपकाव्यतिरिक्त बाहेरचे फर्निचर/ ध्वनीक्षेपक कोणत्याही परिस्थितीत लावता येणार नाही.

v) हॉल अथवा अतिथीगृहाच्या परिसरामध्ये कचरा/घाण करता येणार नाही. तसे निदर्शनास आल्यास नुकसानीची/साफसफाईची किंमत व्यवस्थापन समितीने ठरविलेल्या दराने संबंधितांकडून वसूल केली जाईल.

vi) महाराष्ट्र सदन परिसरातील गवत/झाडेझुडुपे व सुशोभिकरणासाठी वापरलेल्या कोणत्याही साधनांचे नुकसान होणार नाही याची काळजी संबंधितांनी घ्यावयाची आहे. कोणतेही नुकसान झाल्यास संबंधितास व्यवस्थापनेच्या निर्णयानुसार नुकसान भरपाई द्यावी लागेल.

vii) समारंभ कार्यक्रम प्रसंगी येणाऱ्या वाहनांची जबाबदारी व्यवस्थापनाची राहणार नाही. तसेच पार्किंगची व्यवस्था संबंधितास महाराष्ट्र सदनाच्या परिसराबाहेर स्वतःच्या जबाबदारीवर स्वतंत्रपणे करावी लागणार आहे.

viii) मा. राज्यपाल, मा. मुख्यमंत्री/मा. उप मुख्यमंत्री/मा. मुख्य न्यायाधीश/मा. विधान सभा अध्यक्ष/ मा. विधान परिषद सभापती यांच्या दौऱ्याच्या वेळी किंवा इतर काही जनहिताच्या दृष्टीने संबंधित कक्षाची गरज भासल्यास करण्यात आलेले आगाऊ आरक्षण रद्द केले जाऊ शकते.

ix) सदर सुविधांचा कोणत्याही धार्मिक कामासाठी वापर करता येणार नाही.

x) जर मागणीदराने केलेले आगाऊ आरक्षण त्यांच्याकडून काही कारणामुळे रद्द करावयाचे असेल तर त्यांना भरलेल्या आगाऊ रक्कमेच्या ८० टक्के रक्कम परत करण्यात येईल. तथापि व्यवस्थापनाद्वारे बदललेल्या आरक्षणासाठी कोणतीही कपात केली जाणार नाही.

xi) सदर सुविधांसाठी केलेला अर्ज प्रयोजन विचारात घेऊन, मंजूर किंवा नामंजूर करण्याचा अधिकार निवासी आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांच्याकडे राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९०११४५९२७३९०७ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Sumit Sukumar Mullick

Digitally signed by Sumit Sukumar Mullick
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Sumit Sukumar Mullick
Date: 2015.09.05 16:32:11 +05'30'

**( सुमित मल्लिक )**
अपर मुख्य सचिव, तथा
मुख्य राजशिष्टाचार अधिकारी,
महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
६. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
७. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
८. मुख्य माहिती आयुक्त
९. सर्व मंत्रालयीन विभाग
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१३. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
१४. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई
१५. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
२१. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२२. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती

२३. जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. निवड नस्ती, वित्त विभाग/सेवा-५
२६. कार्यालयीन नस्ती